इको-पार्क पोंभूर्णा येथील विद्युतीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.४२५/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- १९ नोव्हेंबर, २०१८**

वाचा :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२४/लेखा/प्र.म./प्र.क्र./प्रशामा/३०२/२०१७-१८, दिनांक १३.०७.२०१८.

**प्रस्तावना:-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर यांचे अधिनस्त इको-पार्क पोंभूर्णा येथील विद्युतीकरणाचे अंदाजपत्रकाची पडताळणी उप कार्यकारी अभियंता, ओ.ॲन्ड एन.विभाग, बल्लारशाह यांनी केलेली आहे. शासन निर्णय दिनांक ३० सप्टेंबर, २०११ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांना विद्युतीकरणाबाबत रुपये २ लक्ष पर्यंतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार असल्यामुळे संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी इको-पार्क पोंभूर्णा येथील विद्युतीकरणाच्या रु.३,५५,०८०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याकरीता विनंती केलेली आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या अभिप्रायास अनुसरुन सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर यांचे अधिनस्त इको-पार्क पोंभूर्णा येथील विद्युतीकरणाच्या रु.३,५५,०८०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.
३. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

४. सदर कामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
५. सदर मंजूरीस वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील अटी व शर्ती बंधनकारक असतील.
६. सदरहू कामे करतांना कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ व शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११९१७०४०१५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.11.19 17:08:06 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)